**करन्सी चेस्ट रक्कम ने-आण करण्याकरता पुरवण्यात आलेल्या बंदोबस्ताचे देयक अदा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# गृह विभाग

**शासन निर्णय क्र.०७१८/५४६६/प्र.क्र.२५८/विशा-१ अ,**
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ०३ मार्च, २०२०.

वाचा : - १) शा.नि.क्र जी.आरडी-०६८९/३९४/पोल -१० मंत्रालय, मुंबई - ४०००३२ दि.०४.१०.१९९०.
२) पोलिस उपायुक्त (अभियान) यांचे क्र.पो.आ,कक्ष-११(४)/१८६८/२०१८, दि.१०.०८.२०१८ चे पत्र.

**शासन निर्णय :-**

भारतीय रिझर्व बँकेच्या करन्सी चेस्टसाठी पोलीस संरक्षण देणेकरिता पुरविण्यात आलेल्या बंदोबस्ताची देयके शासकीय दराने आकरण्यात येत होती. आता त्यामध्ये चलनी नोटा वितरित करण्याकरीता ( Remittance of treasure from Reserve Bank to currency Chest ) पुरवण्यात आलेल्या सशस्त्र पोलीस बंदोबस्ताचे देयक शासकीय देय दराने आकारण्याबाबत शासन मंजुरी देत आहे. सदर पोलिस रक्षकांच्या सर्व पदांचे वेतन, भत्ते व इतर बाबींवर होणारा संपूर्ण खर्च हा त्या त्या बँका सोसणार असून तो त्यांनी आगाऊ दिल्यानंतर त्यांना पोलिस गार्ड पुरवण्यात येतील.

भारतीय रिझर्व बँक, मुंबई यांचेकडून मागणी केल्याप्रमाणे तात्पुरत्या स्वरूपातील करन्सी चेस्टची रक्कम ने-आण करण्याकरिता सशस्त्र पोलीस दलाकडून आवश्यक ते सशस्त्र गार्ड पुरवण्यात येतील. भारतीय रिझर्व्ह बँकेस तात्पुरत्या स्वरूपात बँकेची रक्कम ने-आण करण्याकरिता संरक्षणार्थ पुरवण्यात आलेल्या सशस्त्र पोलिस बंदोबस्ताची थकीत रक्कम ग्रास प्रणालीद्वारे भरण्यात यावी. सदर रकमेचा तसेच या पुढील पुरवण्यात येणाऱ्या बंदोबस्तापोटी प्राप्त होणारी आगावू रक्क्म या “लेखाशिर्ष ००५५००२१०१ - महसूल जमा” या लेखाशिर्षाखाली ग्रास प्रणालीद्वारे भरण्यात यावी.

भारतीय रिझर्व बँकेस करन्सी चेस्टची रकमेचा ने-आण करण्याकरिता सशस्त्र गार्ड पुरविल्यानंतर भारतीय रिझर्व बँकेने एक महिन्याच्या आत पोलिस बंदोबस्त शुल्क जमा करण्यात यावे अन्यथा महाराष्ट्र पोलीस नियमावली १९१९ मधील तरतुदीनुसार ९.५ टक्के दराने व्याज आकारण्यात यावे.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ २८०/१९/व्यय-७, दिनांक २८.०८.२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३०३१५१६२७२०२९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार नावाने,

Deepak Tukaram Kharat

Digitally signed by Deepak Tukaram Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=902e21bb580b52a1e246b37b697ca20f0db2834da41f6840afd03916d8ed1b76, serialNumber=d8bd67045829179609f51b88a183cd0a4a3acd98db48b22b5faf5a9efc780e70, cn=Deepak Tukaram Kharat
Date: 2020.03.03 15:20:16 +05'30'

**( दि.तु.खरात )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/नागपूर/पुणे/नवी मुंबई/औरंगाबाद/अमरावती/नाशिक
३) संचालक, लेखा व कोषागारे (संगणक शाखा), नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता, लेखा परिक्षा), मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
७) वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती (विशा-१ अ)